**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (खुदद्) मधील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- सववि-३३.२४/प्र.क्र.१२३/आस्था-१,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १९ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सववि-३३.१४/प्र.क्र.३५७/आस्था-१, दि.२८.०८.२०१४.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सववि-१०.१६/प्र.क्र.४६३/आस्था-१, दि.०६.१२.२०१६.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सववि-३३.१७/प्र.क्र.११२/आस्था-१, दि.१६.०२.२०२३.
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सववि-३३.२२/प्र.क्र.४९३/आस्था-१, दि.०४.०७.२०२३.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सववि-३३.१७/प्र.क्र.११२/आस्था-१, दि.२२.०९.२०२३.
६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ येथील दि.२१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या, तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या, परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते दि. ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

संदर्भाधिन क्र.४ येथील दिनांक ०४.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग (खुद्द) विभागासाठी सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात आला असून विभागातील एकूण १९२ नियमित पदांच्या व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या २१ मनुष्यबळ सेवा अशा एकूण २१३ पदांचा त्यामध्ये समावेश करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सुधारित आकृतीबंधातील २१३ पदांपैकी ६३ अस्थायी पदांना संदर्भीय अ.क्र. ५ येथील दि.२२.०९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०९.२०२३ ते दिनांक २९.०२.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे. त्यानुसार सुधारित आकृतीबंधातील एकूण पदांपैकी ६३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या दि.२१.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संदर्भाधिन दिनांक ०४.०७.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात

आलेल्या एकुण २१३ पदांपैकी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **"विवरणपत्र-अ"** मध्ये नमुद केलेल्या **६३** अस्थायी पदांना या शासन निर्णयान्वये **दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४** पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

या पदांपैकी नियमित वेतनश्रेणीवर असलेल्या पदांवर होणारा खर्च मागणी क्रमांक "व्ही-२, ३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट- (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, दत्तमत (३४५१ ०३०४)" या लेखाशीर्षाखाली व मृत संवर्गातील बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या पदांवर होणारा खर्च, "मागणी क्रमांक व्ही-२, ३४५१ सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९० सचिवालयीन, (०१) सचिवालयीन आर्थिक सेवा (०१)(०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, (३४५१ ०३०४) १०-कंत्राटी सेवा" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ च्या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून/ मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०३१९१४४१४०७७०२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सोबत** : विवरणपत्र 'अ'

SANTOSH
PUNAMCHAND
KHORGADE

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c0546acca372ce2d8edbe5dc7949386daf8955a34dfda38bf6f34ce12b899ea7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=08CF3286085F1309FD153E0C9A31F18D1C3CE4865E7DF75B4F8AA7B75A9A81EA, cn=SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2024.03.19 14:53:45 +05'30'

**( सं.पु.खोरगडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती (आस्था-१)

विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक सववि-३३.२४/प्र.क्र.१२३/आस्था-१, दिनांक : १९.०३.२०२४ सोबतचे विवरणपत्र

(१) नियमित पदे

| अ.क्र. | पदनाम | दि. ०४.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार आकृतीबंधातील मंजुर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | अ.मु.स./प्र.स./ सचिव | २ | २ | - |
| २ | सह सचिव/उप सचिव | ६ | ४ | २ |
| ३ | अपर निबंधक-नि-सह सचिव | १ | - | १ |
| ४ | अवर सचिव | ८ | ७ | १ |
| ५ | अवर सचिव (विधि) | १ | - | १ |
| ६ | कक्ष अधिकारी | २३ | १८ | ५ |
| ७ | सहायक कक्ष अधिकारी | ४८ | ३८ | १० |
| ८ | सहायक लेखा अधिकारी | ३ | २ | १ |
| ९ | वरीष्ठ स्वीय सहायक | १ | १ | - |
| १० | निवडश्रेणी लघुलेखक | २ | १ | १ |
| ११ | उच्चश्रेणी लघुलेखक | ६ | ६ | - |
| १२ | निम्नश्रेणी लघुलेखक | १२ | ७ | ५ |
| १३ | लघुटंकलेखक | ३ | १ | २ |
| १४ | लिपिक/लिपिक-टंकलेखक | ७६ | ६३ | १३ |
| एकूण | | १९२ | १५० | ४२ |

(२) आकृतीबंधानुसार मृत संवर्गातील पदे :-

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | वाहनचालक | ३ | - | ३ |
| २ | नाईक/शिपाई | १८ | - | १८ |
| एकूण | | २१ | - | २१ |

एकूण स्थायी व अस्थायी पदे

| | | | |
|---|---|---|---|
| एकूण (१) + (२) | २१३ | १५० | ६३ |